चंद्रपूर जिल्ह्यातील ब्रम्हपुरी व सिंदेवाही तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक बांधकाम विभाग

शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१६/प्र.क्र.१०१/नियोजन-२

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- २८ जून, २०१७

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्रमांक का.प्रआ/१७०५ दि.२१/०४/२०१७

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी संदर्भाधिन पत्रांन्वये चंद्रपूर जिल्ह्यातील ब्रम्हपुरी व सिंदेवाही तालुक्यातील एकूण ३ रस्ते प्रजिमा म्हणुन दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

सदर प्रस्ताव व सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या तसेच रस्त्यांचा एकुण होणारा वापर विचारात घेता सदर रस्ते प्रजिमा म्हणुन दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव व स्थानिक लोकप्रतिनिधींची मागणी विचारात घेऊन चंद्रपूर जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | रस्त्यांची नावे | साखळी क्रमांक | अंतर (कि.मी.) | पूर्वीच्या रस्त्यांचा क्रमांक | नव्याने दिलेला प्रजिमा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| | **तालुका - ब्रम्हपुरी** | | | | |
| १. | मेंडकी (टेकरी) - जवराबोडी - जुगनाळा - बेटाळा - सोनेगांव - सावलगांव - चिखलगांव - लाडज. | ०/०० ते २४/०० | २४.००० | इ.जि.मा.१२८ (२१.०० कि.मी) | ७८ |
| २. | ब्रम्हपुरी - मालडोंगरी - रानबोथली ते मेंडकी (इजिमा-८९). | ०/०० ते १६/०० | १६.०० | इजिमा ८९ (१६ कि.मी.) | ७९ |
| | **तालुका-सिंदेवाही** | | | | |
| ३. | रामा ३७५ ते सावरगाटा - मरेगांव - गुंजेवाही - पवनपार- टेकरी ते प्रजिमा ३० | ०/०० ते १२/८०० | १२.८०० | इजिमा ६७ (६.४००कि.मी) इजिमा १२९ (६.४०० कि.मी.) | ८० |

असे एकूण ३ इ.जि.मा./ग्रा.मा. रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत. सदर रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती केल्यास रस्ते विकास योजना २००१-२१ मधील चंद्रपूर जिल्ह्यातील **प्रमुख जिल्हा मार्ग** लांबीत **५२.८० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी **१९००.९० कि.मी.** इतकी होईल. इतर जिल्हा मार्गाच्या जिल्ह्याच्या लांबीत **४९.८० कि.मी.** ने घट होऊन एकूण लांबी **१६३४.४५ कि. मी.** इतकी होईल. तसेच ग्रामीण मार्गाच्या एकूण लांबीत **३.००** कि.मी.ने घट होऊन एकूण लांबी **४९५२.३७ कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६२८१७०७०६५२१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2017.06.28 17:05:18 +05'30'

( प्रशांत पाटील )
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी,चंद्रपूर.

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, चंद्रपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,नागभीड.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

९) निवडनस्ती.